**प्राथमिक शिक्षक, जिल्हा परिषद, औरंगाबाद या पदावर केलेली सेवा, शासन सेवेस जोडून देण्याबाबत व प्रारंभिक वेतन निश्चिती होणेबाबत...**
**श्री. बाबासाहेब मनोहरे,मुख्याधिकारी गट-अ**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१५/प्र.क्र. २२५/नवि १४**
**हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**तारीख: ०३ नोव्हेंबर, २०१५**

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः वेतन१२८९/प्र.क्र. २/९०/सेवा-३,दि. २३.०३.२१९९४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अंनियो १००६/८७/सेवा-४, दि. १२.०१.२००७
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अंनियो-१००९/प्र.क्र. ३२/सेवा-४,दि. १८.०८.२००९

प्रस्तावना -

श्री. बाबासाहेब पुंडलीकराव मनोहरे यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने नगर परिषद मुख्याधिकारी (श्रेणी-१), नगर विकास विभाग या पदासाठी शिफारस केली होती. शासन निर्णय क्र. एमसीओ-१२०९/५१४/प्र.क्र. १४६/नवि १४, दिनांक ०७.०७.२०१० च्या आदेशान्वये त्यांना जिल्हा प्रकल्प अधिकारी, चंद्रपूर येथे पदस्थापना देण्यात आली होती.

०२. श्री. बाबासाहेब मनोहरे हे मुख्याधिकारी या पदावर रुजू होण्यापुर्वी जिल्हा परिषद, औरंगाबाद अंतर्गत दिनांक ०३.०४.२००२ ते २८.०७.२०१० या कालावधीत “प्राथमिक शिक्षक” या पदावर कार्यरत होते. प्राथमिक शिक्षक या पदावर कार्यरत असताना श्री. मनोहरे यांनी महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत “मुख्याधिकारी” या पदावरील नियुक्तीसाठी त्यांच्या कार्यालयाकडे विहित पद्धतीने अर्ज केला होता. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद यांनी त्यांच्या दिनांक २८.०७.२०१० च्या आदेशान्वये मुख्याधिकारी पदावर रुजू होण्याकरीता कार्यमुक्त केले आहे. श्री. बाबासाहेब मनोहरे हे शासन आदेश, नगर विकास विभाग, दिनांक ०७.०७.२०१० अन्वये दि. २९.०७.२०१० रोजी मुख्याधिकारी गट-अ या पदावर जिल्हा प्रकल्प अधिकारी, चंद्रपूर येथे रुजू झाले असल्याने त्यांच्या सेवेत कोणत्याही प्रकारचा खंड पडलेला नाही.

०३. श्री. बाबासाहेब मनोहरे हे दिनांक ०१.११.२००५ पूर्वी प्राथमिक शिक्षक या पदावर कार्यरत होते. सदर सेवा सोडुन ते राज्य शासनाच्या सेवेत विहित मार्गाने रुजू झालेले असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२, व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरेल. तसेच श्री. मनाहेरे यांना प्राथमिक शिक्षक पदावरील सेवा व नियमित वेतन वेतनश्रेणीतील सेवा त्यांच्या निवृत्ती वेतन लाभासाठी ग्राह्य धरता येईल.

**शासन निर्णय-**

उक्त परिच्छेदात नमुद केलेली परिस्थिती विचारात घेता श्री. बाबासाहेब पुंडलीकराव मनोहरे, मुख्याधिकारी गट-अ यांना दिनांक ०३.०४.२००२ ते दिनांक २८.०७.२०१० या कालावधीमध्ये केलेली "प्राथमिक शिक्षक" या पदावरील सेवा त्यांच्या सध्याच्या "मुख्याधिकारी गट-अ" या पदावरील सेवेस जोडून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यामुळे श्री. बाबासाहेब मनोहरे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरेल. तसेच श्री. बाबासाहेब मनोहरे यांनी प्राथमिक शिक्षक या पदावर केलेली सेवा नियमित वेतनश्रेणीतील सेवा त्यांच्या निवृत्ती वेतन लाभासाठी ग्राह्य धरण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५११०३१५११२७५४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=UDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2015.11.03 15:12:16 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, अमरावती विभाग, अमरावती.
३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१/२- मुंबई/ नागपूर
४. जिल्हाधिकार, अकोला
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद
६. श्री. बाबासाहेब पुंडलीकराव मनोहरे, मुख्याधिकारी अकोट नगरपरिषद, जि. अकोला.
७. निवड नस्ती/ नवि १४